**महाराष्ट्र शासन**

क्रमांक -:संकिर्ण-२०२३/प्र.क्र.५१/रो.आ.१

सार्वजनिक बांधकाम विभाग,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २१ मे २०२५

**विषय-** मागणी अभावी सहा वर्षापेक्षा जास्त कालावधी झालेल्या प्रलंबित देयकाच्या अदायगीस प्रशासकीय विभागाची मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम क्र.३९ ब नुसार विलंब क्षमापित करण्यास मंजूरी मिळणेबाबत--श्री.विजय विठठल बर्गे , सेवानिवृत्त वाहनचालक (रु.आ.)

**ज्ञापन -**

मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग,पुणे यांचे कार्यालय,पुणे यांनी त्यांचे जा.क्र.मुअ (पुणे)/आ.वेतन/५५८३/सन २०२३, दिनांक ७/९/२०२३ व दिनांक ७.३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये श्री.विजय विठठल बर्गे , सेवानिवृत्त वाहनचालक (रु.आ.) यांच्या वेतन फरकाची रक्कम रु.१,५५,८४८/- ही भविष्य निर्वाह निधी खात्यात प्रदान करण्यास झालेल्या प्रशासकीय विलंबाच्या कारणांसह मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम क्र.३९ ब नुसार सहा वर्षापेक्षा जास्तीचा झालेला विलंब क्षमापित करण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

२. त्यानुषंगाने मला आपणांस असे कळविण्याचे निदेश आहेत की, आपण सादर केलेल्या प्रस्तावानुसार, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्रा २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग २, दि. १७.०४.२०१५ मधील परिशिष्टातील मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार-भाग पहिला, उपविभाग-एक, नियम क्र. ३९ (ब)टिप-५ मध्ये विहित केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने, मंत्रालयीन प्रशासकीय विभागास असलेल्या प्राधिकारानुसार श्री.विजय विठठल बर्गे , सेवानिवृत्त वाहनचालक (रु.आ.)यांनी मागणी न केल्यामुळे सहा वर्षापेक्षा अधिक कालावधीसाठी प्रलंबित राहिलेल्या वेतन फरकाची रक्कम , प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यात प्रदान करण्यास झालेला सहा वर्षापेक्षा जास्तीचा झालेला विलंब क्षमापित करण्यात येत असून , सदर रकमेचे देयक कोषागारात सादर करुन श्री.बर्गे , सेवानिवृत्त वाहनचालक यांना प्रदान करण्यास खालील नमुद अटी व शर्तीच्या अधीन राहुन ,या ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१. शासनाने संबंधित वाहनचालक यांना रुपांतरित सेवेवर घेतल्यापासूनच्या आदेशाच्या दिनांकापासुन म्हणजे दिनांक १९/१/२००२ पासुन ते ज्ञापनाच्या दिनांकापावेतो , सदर वेतन फरकाची रक्कम अदा करण्यात आलेली नाही, याबाबत मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग,पुणे यांचे कार्यालय,पुणे यांनी कटाक्षाने खात्री करुन घ्यावी.

२. भविष्यात, अश्या प्रकारची वेतन फरकाची रक्कम श्री.बर्गे यांना यापुर्वी अदा करण्यात आल्याचे निदर्शनास आल्यास , सदर रक्कम शासनास तातडीने एकरकमी परत करणेबाबत हरकत/तक्रार नसल्याचे प्रतिज्ञापत्र संबंधिताकडुन घेण्यात यावे.

३. दिनांक १/३/१९८६ ते दिनांक ३१/८/२००० पावेतोच्या परिगणित करण्यात आलेल्या वेतन फरकाची रक्कम योग्य असल्याबाबत तसेच रकमेचे अतिप्रदान होणार नाही, याबाबत मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग,पुणे यांचे कार्यालय,पुणे यांनी कटाक्षाने खात्री करुन दक्षता घ्यावी.

४. दिनांक १/३/१९८६ ते दिनांक ३१/८/२००० पावेतोच्या परिगणित करण्यात आलेल्या वेतन फरकाच्या रक्कमेवर आजरोजी व भविष्यात कोणत्याही प्रकारच्या व्याजाची मागणी करणार नसलेबाबत संबंधितांकडुन प्रतिज्ञापत्र घेण्यात यावे.

३. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०२५०५२१११११०२१२०१८ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANANDA SHIVAJI NIMBALKAR

Digitally signed by ANANDA SHIVAJI NIMBALKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=bd8b8d40b9fcd5b18aaaef1d1760b7112f7fbabce1279c5ea681b9a1193cb544, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=03860AF74163AFB28DF97DAA3229C54F81BFC64ECEC50CAABAD97C7C8AEDB890, cn=ANANDA SHIVAJI NIMBALKAR
Date: 2025.05.21 11:11:28 +05'30'

**( आ.शि .निंबाळकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग,पुणे यांचे कार्यालय,पुणे (दोन प्रती)

**प्रत:-**

१) महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता),सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी शाखा, महाराष्ट्र, मुंबई.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा
३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, पुणे/सातारा.
४) श्री.विजय बर्गे, सेवानिवृत्त वाहनचालक (कार्यालयामार्फत)
५) रोजंदारी आस्थापना-१ कार्यासन संग्रहार्थ.